श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीकुलदेवतायै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीरुक्मिणीपांडुरंगाभ्यां नमः । ॐनमोजी
जगद्गुरु उदारा। श्रीमद्भीमातीरविहारा। पुराणपुरुषा दिगंबरा। ब्रह्मानंदा सुखाब्धे[१]॥ १ ॥ तूं सकळ श्रेष्ठांचा श्रेष्ठ साचार। तूंचि
आदिमायेचा[२] निजवर[३]। ब्रह्मा विष्णु महेश्वर। तिघे पुत्र निर्मिले ॥ २॥ अनंत ब्रह्मांडें त्यां हातीं । तूंचि घडविसी जगत्पती।
सकळ देव वर्तती। तुझिया सत्तेकरूनियां ॥ ३ ॥ तूंचि जाहलासी गजवदन। चतुर्दश विद्यांचें भुवन। महासिद्धि कर जोडोन।
सदा तिष्ठती[४] तुजपुढें ॥ ४ ॥ जय अनंतकल्याणवरदमूर्ति । त्रैलोक्यभरित तुझी कीर्ति । सुरासुर[५] तुज नमिति । श्रीगणपति
दयार्णवा ॥ ५ ॥ अरुणसंध्यारागरत्नज्योति[६]। कीं उगवला बाळगभस्ति[७]। तैसी गणपति तुझी अंगकांति। आरक्त वर्ण दिसतसे
॥ ६ ॥ कीं शेंदुरें चर्चिला मंदराचळ[८]। परम तेज झळके सोज्वळ। विशाल उदर दोंदिलें[९]। माजी त्रिभुवन सांठवलें ॥ ७॥ दुग्ध-
समुद्रीं ओपिलें। कीं निर्दोष यश आकारलें। तैसें शुभ्रवस्त्र परिधान केलें। ध्यानीं मिरवलें भक्तांच्या ॥ ८॥ विनायकीं रिपूंचें[१०] कटि-
सूत्र[११]। तळपे विराजमान विचित्र। जांबूनद सुवर्ण पवित्र। त्याचे अलंकार सर्वांगीं ॥ ९॥ जैसा पौर्णिमेचा नक्षत्रनाथ[१२]। तैसा
एकदंत झळकत। कीं सौदामिनी[१३] लखलखित। मेघमंडळावेगळी ॥ १० ॥ परशु[१४] अंकुश इक्षुदंड[१५]। पाश[१६] गदा दंतखंड[१७]। पंकज[१८] आणि
कोदंड[१९]। अष्ट हस्तीं आयुधें[२०] ॥ ११ ॥ गणपति तुझें नृत्य देखोन। सदाशिव सदा सुप्रसन्न। सकळ देव टाळ घेऊन। उभे राहती
नृत्यकाळीं ॥ १२ ॥ धिमकिटी धिमकिटी तकधा विचित्र। रंगगौलता[२१] संगीतशास्त्र। नृत्यकळा देखोनि देवांचे नेत्र। पातीं[२२] हालवूं
विसरले ॥ १३ ॥ गंडस्थळींचा दिव्य आमोद[२३]। त्यावरी रुणझुणती षट्पद[२४]। सव्यभागीं[२५] देवांचे वृंद[२६]। वामभागीं[२७] दानव पैं ॥ १४ ॥
अष्टसिद्धि[२८] चामरें[२९] घेऊनी। वरी वारिती अनुदिनीं[३०]। भृंगी[३१] भृंगी मृदंगीं दोनी। वाद्यकळा दाविती ॥ १५ ॥ सुरासुर पाहती नृत्य-
कौतुक। जेथें जेथें तुटे थांक[३२]। मान तुकाविती ब्रह्मादिक। तालसंकेत देखतां ॥ १६ ॥ हस्तसंकेत दावी गणपति। तडित्प्राय[३३] मुद्रिका

---

१ सुखाचा सागर अशा. २ मूळ प्रकृतीचा. ३ नियंता, स्वामी. ४ उभ्या राहतात. ५ देव आणि दैत्य. ६ अरुणोदय व संध्या समयाच्या उजेडाप्रमाणें लाल. ७ बाळसूर्य. ८ मंदार पर्वत. ९ मोठें पोट. १० सर्पाचें. ११ करगोटा. १२ चंद्र. १३ वीज. १४ कुऱ्हाड. १५ ऊंस. १६ फासा. १७ हस्तिदंत. १८ कमल. १९ धनुष्य. २० हत्यारें. २१ गाण्यांतील माधुरी. २२ पापण्या. २३ सुवास. २४ भुंगे. २५ उजव्या बाजूस. २६ समुदाय. २७ डाव्या बाजूस. २८ आठ. २९ चवऱ्या. ३० दररोज. ३१ शिवाचा अनुचर. ३२ तालाचें मुख्य ठिकाण, सम. ३३ विजेप्रमाणें.

झळकती। सर्व अलंकारांची दीप्ति[1]। पाहतां भुलती शशिसूर्य ॥ १७ ॥ ऐसा तूं महाराज गणनाथ। तुझें कोणा वर्णवे महत्त्व। आरंभिला हरिविजयग्रंथ। पाववी हा सिद्धीतें ॥ १८ ॥ जैसा अर्भक छंदें[2] घेत। पिता कौतुकें लाड पुरवित। तैसी येथें पदरचना समस्त। गजवदना पुरवी तूं ॥ १९ ॥ तुझें नाम घेतां गणपती। विघ्नें बारा वाटा पळती। जैसा प्रगटतां झंजामारुत[3]। जलदजाल[4] वितुळे ॥ २० ॥ मृगेंद्र येतो ऐकतां कानीं। मातंगा[5] पळतां थोडी मेदिनी[6]। कीं हरिनामघोष ऐकतां कानीं। दूरी पळती भूतें प्रेतें ॥ २१ ॥ कीं जागा देखोनि घरधनी। तस्कर[8] पळती तेच क्षणीं। तैसें तुझें नाम घेतां वदनीं। विघ्नें पळती गजवदना ॥ २२ ॥ देवा तुझें स्तवन न करवे। आकाशा गवसणी[9] न घालवे। जलनिधि[10] कैसा सांठवे। मुंगीचिया उदरांत ॥ २३ ॥ पृथ्वीचें वजन न करी कोणी। मुष्टीं न माये वासरमणी[11]। ब्रह्मांड विदारितां[12] वायु बांधोनी। पालवीं[13] कोणा आणवे ॥ २४ ॥ ऐसा तूं सिद्धि-विनायक। तुज दुसरा नसे नायक। तुझ्या कृपेनें सकळिक। शब्दब्रह्म[14] आकळे ॥ २५ ॥ आतां नमूं वागीश्वरी[15]। परा[16] पश्यंती[16] मध्यमा[16] वैखरी[16]। चहूं वाचांची ईश्वरी। कमलोद्भवतनया[17] जे ॥ २६ ॥ अंबे तुझी कृपा जोडे। तरी मुकाही वेदशास्त्र पढे। तूं स्नेहें पाहसी पाषाणाकडे। तरी होय महामणि ॥ २७ ॥ माते तुझेनि वरदानें। जन्मांधही पारखी रत्नें। रंक ते होती राणे। कृपेनें तुझ्या सरस्वति ॥ २८ ॥ तूं कविमानसमांदुसरत्न[18]। सकळ मातृकांचें[19] निजजीवन। अंबे तुझें चातुर्य देखोन। रमा उमा लज्जित ॥ २९ ॥ तुझें सौंदर्य देखोनि गाढें। मन्मथ[20] होवोनि राहिले वेडें। अष्टनायिका तुजपुढें। अधोवदन पाहती ॥ ३० ॥ तूं बोलसी जेव्हां वागीश्वरी[15]। दंततेजें झळके धरित्री। तेथींचे खडे निर्धारीं। पद्मराग पैं होती ॥ ३१ ॥ अंबे तुझें जेथें उमटती चरण। तेथें लोळे वसंत येऊन। त्या सुवासा वेधून। भ्रमर तेथें रुंजती ॥ ३२ ॥ तुझ्या आंगींच्या सुवासेंकरूनी। दाही दिशा गेल्या भरोनी। परब्रह्मीं उठली जे ध्वनी। आदिजननी तेचि तूं ॥ ३३ ॥ तप्त सूर्या जैसें सुरंग। तैसें जननि तुझें सर्वांग। पंकज-नेत्र सुरेख चांग। अधर[21] बिंबासारिखे[22] ॥ ३४ ॥ सरळ नासिका विशाळ भाळ। कर्णीं तांटंकाचा[23] झळाळ। कीं शशि सूर्य निर्मळ।

१ प्रकाश, तेज. २ हट्ट. ३ सोसाट्याचा वारा. ४ मेघांचा समुदाय. ५ पांगे. ६ हत्तीला. ७ पृथ्वि. ८ चोर. ९ आवरण, आच्छादन. १० समुद्र. ११ सूर्य. १२ तुकडे करणें. १३ पदरांत. १४ शब्दज्ञान. १५ सरस्वती. १६ वाणीचे चार प्रकार. १७ सरस्वती. १८ कविच्या मनोरूपी पेटींतील रत्न. १९ ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी, चामुंडा, चर्चिका या आठ देवता. २०. काम, मदन. २१ ओठ. २२ पिकलेल्या तोंडल्याप्रमाणें. २३ तानीवड्यांचा.

कर्णीं येऊन लागले ॥३५॥ कर्णीं मुक्तघोस ढाळ देती । गंडस्थळीं दिसे प्रदीप्ती । कीं नक्षत्रपुंज एकत्र स्थिती । कर्णीं लागती शारदेच्या ॥३६॥ गळां मोतियांचे दिव्य हार । शुभ्र कंचुकी शुभ्र वस्त्र । आपादमस्तकावरी[3] समग्र । दिव्य अलंकार झळकती ॥३७॥ आरूढली हंसासनीं । दिव्य वीणा हातीं घेऊनी । आलाप करितां मधुर ध्वनी । सुरवर आयकोनि तटस्थ ॥३८॥ सुरासुर गण गंधर्व । सिद्ध चारण मुनीपुंगर्व । अंबे तुझ्या चरणीं भाव । धरिती सर्व आदरें॥३९॥श्रीधर निज भावेंकरून।जननि तुज अनन्यशरण।माझ्या जिव्हाग्रीं राहोन।हरिविजयग्रंथ बोलवीं॥४०॥गणेशसरस्वतींचें स्तवन। वदविलें जेणें दयेंकरून । तो ब्रह्मानंद श्रीगुरु पूर्ण। त्याचे चरण वंदूं आतां॥४१॥तो ब्रह्मानंद पिता निश्चितीं।सावित्री तयाची शक्ती।हीं तों आदिपुरुष मूळप्रकृती।माता पिता वंदिलीं॥४२॥ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम करून।वानप्रस्थही आचरून।संन्यासदीक्षा घेऊन । त्रिविध आश्रम त्या गिले॥४३॥पंढरीये भीमातटीं । समाधिस्थ वाळवंटीं । पूर्णज्ञानी जैसा धूर्जटी । तापसियांमाजी श्रेष्ठ॥४४॥ज्यासीं बाळपणापासून । परनारी मातेसमान । परद्रव्य पाहे जैसें वमन । आनंदघनस्वरूप पैं॥४५॥ कामादिक षड्वैरी । जेणें लोटोनि घातले बाहेरी । ज्याच्या कृपावलोकनें निर्धारीं । ज्ञान होय प्राणियां॥४६॥जें निस्सीम वेदांतज्ञान।तें ज्यास करतलामलक पूर्ण।वंदिले तयाचे चरण।ग्रंथारंभीं आदरें॥४७॥गुरुपद सर्वांत श्रेष्ठ।त्याहून नाहीं कोणी वरिष्ठ।कल्पवृक्ष म्हणावा विशिष्ट । तरी कल्पिलें पुरवितो॥४८॥मातापितयां समान ।जरी म्हणावा सद्गुरु पूर्ण । ती उपमा येथें गौणं । न घडे जाण सर्वथा॥४९॥ज्या ज्या जन्मा जाय प्राणी। तेथें मायबापें असती दोनी । परी सद्गुरु कैवल्यदानी[11]। तो दुर्लभ सर्वदा॥५०॥जरी अनंत पुण्याच्या राशी । तरीच भेटी सद्गुरूशीं । नाहीं तरी व्यर्थ नरदेहासी। येऊनि सार्थक काय केलें॥५१॥श्रीगुरुवांचोनि होय ज्ञान।हें कोळत्रयीं[12] न घडे पूर्ण । आत्मज्ञानावांचून[13]। सुटका नव्हे कल्पांतीं॥५२॥श्री रामावतार परिपूर्ण । तोही धरी वसिष्ठाचे चरण । श्रीकृष्ण ब्रह्म सनातन[14] । अनन्यशरण सांदीपना॥५३॥व्यास नारदासी शरण रिघे।इंद्र बृहस्पतीच्या पायां लागे।उमा शिवासी शरण रिघे।आत्मज्ञानप्राप्तीसी॥५४॥शुक नारद प्रल्हाद।वाल्मीक

---

१ तेज. २ प्रज्वलित. ३ पायापासून डोक्यापर्यंत. ४ श्रेष्ठ ऋषि. ५ शंकर. ६ ओकारी. ७ काम, क्रोध, मद, मत्सर, लोभ व मोह हे सहा शत्रु. ८ करपटासमान, हातचा मळच. ९ असामान्य. १० गैर लागू. ११ मोक्षदाता. १२ कधींही. १३ स्वतःची ओळख झाल्याशिवाय. १४ अनादि.

वासिष्ठादि ऋषिवृंद । इतुकेहि गुरुपदकमळींचा आमोद[1] । भ्रमर होऊनि सेविती ॥५५॥ उद्धव अर्जुनादिक भक्त । गुरुभजनीं तरले समस्त। अपरोक्षज्ञान[2] प्राप्त। सद्गुरूवांचूनि न घडे ॥५६॥ दुग्धींच नवनीत असे। हें आबालवृद्ध जाणतसे। परी संथनाविण कैसें। हातीं सांपडे सांग पां ॥५७॥ उगेंचि दुग्ध घुसाळिलें। अवघा वेळ जरी शोधिलें। परी तें हातवटीवेगळें। नवनीत न सांपडे ॥५८॥ जेथें जेथें प्राणी बैसत। तेथें तेथें निधानें[3] असती बहुत। परी अंजन नेत्रीं न घालितां सत्य। न सांपडती खणतांही ॥५९॥ नेत्र उत्तम सतेजपणीं। परी नुगवतां वासरमणी[4]। जवळी पदार्थ असोनी। न दिसे नयनीं प्राणियां ॥६०॥ तैसें सद्गुरूसी शरण न रिघतां । अपरोक्षज्ञान[2] न लागे हातां। यालागीं ब्रह्मानंदासी तत्त्वतां । शरण अनन्य मी असे ॥६१॥ श्रीगुरुराया तूं समर्थ। हा हरिविजय आरंभिला ग्रंथ। शेवटासी पावो यथार्थ। तुझ्या वरेंकरूनियां ॥६२॥ तूं मेघ वर्षसी दयाळ। तरीच हें ग्रंथरोप वाढेल। साधकचातक तृप्त होतील। भक्तीची ओल बहु होय ॥६३॥ माता करी प्रतिपाळ । तों तों वाढो लागे बाळ। तुझ्या कृपेविण बोल। न बोलवे सर्वथा ॥६४॥ जोंवरी नाहीं वाजविता । तों पांवा न वाजे सर्वथा । सूत्रधार न हालवितां । काष्ठपुतळा[5] नाचेना ॥६५॥ ऐसें ऐकोनी श्रीगुरुनाथ। म्हणे सिद्धी पावेल सकळ ग्रंथ । आतां वंदूं श्रोते संत । जे कृपावंत सर्वदा ॥६६॥ जे चातुर्यार्णवींचीं[6] रत्नें । कीं शांतिभूमीचीं[7] निधानें । कीं भक्तिवनींचीं सुमनें[8] । विकासिलीं[9] साजिरीं ॥६७॥ कीं ते वैराग्यअंबरींचे[10] दिनकर[11] । कीं अक्षय विज्ञानानंद[12]चंद्र । कीं अपरोक्षज्ञानसमुद्र[13]। न लागे अंत कोणातें ॥६८॥ कीं ते प्रेमगंगेचे ओघ । कीं ते स्वानंदसुखाचे मेघ । अखंड धारा अमोघ[14] । वर्षती मुमुक्षुचातकां ॥६९॥ कीं ते श्रवणामृताचे कुंभ । कीं ते कीर्तनाचे अचळे[15] स्वयंभ । कीं ते स्मरणाचे सुप्रभ । ध्वजाचि पूर्ण उभारिले ॥७०॥ कीं ते हरिपद्मींचे भ्रमर । कीं विवेकमेरूचीं[16] शृंगें[17] सुंदर । कीं ते क्षमेचे तरुवर। चिदाकाशीं उंचावले ॥७१॥ कीं ते मननजळींचे मीन[18] । कीं ते भवगजावरी[19] पंचानन[20] । कीं परमार्थाचीं सदनें पूर्ण। निर्मळ शीतळ सर्वदा ॥७२॥ कीं ते दयेचें भांडार । कीं उपरतीचें[21] माहेर । कीं कीर्तीचीं

---

१ सुवास. २ प्रत्यक्षज्ञान. ३ गुप्त धन. ४ सूर्य. ५ लाकडी बाहुली. ६ चातुर्य समुद्रांतील. ७ शांतिरूपभूमींतील. ८ फुलें. ९ फुललीं. १० वैराग्यरूपी आकाशांतील. ११ सूर्य. १२ अनुभवज्ञानी. १३ प्रत्यक्ष ज्ञानाचा समुद्र. १४ पुष्कळ, विपुल. १५ पर्वत. १६ तारतम्य बुद्धिच्या पर्वतांचीं. १७ शिखरें. १८ मासे. १९ संसाररूपीं हत्तीवर. २० सिंह. २१ वैराग्याचें.

जहाजें थोर।भक्तिशीड फडके वरी॥७३॥कीं ते परलोकींचे सोयरे सखे।कीं ते अंतकाळींचे पाठिराखे। वैकुंठनाथ ज्यांचे भाके।गुंतोनि तिष्ठे त्यांपाशीं॥७४॥ऐसे ते महाराज संत।जे सकळांवरी कृपावंत।जे दीनवत्सल भेदरहित।आपपर नेणती जे॥७५॥देवांसमान म्हणावें संत।हे गोष्टीच असंमत।देव जैसी भक्ति देखती सत्य। होती तैसे प्रसन्न ॥७६॥ जे सेवा करिती बहुत। त्यांस उत्तम फळ देत। जे भजन न करिती यथार्थ। त्यांवरी देव कोपती ॥७७॥ त्यांस दरिद्र आणोनी। प्राणियांसी पाडिती अधःपतनीं।तैसी नव्हे संतांची करणी।समसमान सर्वांतें ॥७८॥ सर्वांवरी दया समान। एक उत्तम एक हीन। हें न देखतीच संत पूर्ण। जन वन समान तयांसी ॥७९॥ एकाचें करावें कल्याण। न भजे त्याचें अकल्याण। हें देवांचें कर्तृत्व पूर्ण। संत समान सर्वांतें॥८०॥जैसा कायेचा विचार होतसे। तैसी तैसी छाया दिसे। आपण बैसतां छाया बैसे।उठतां उभी ती होय॥८१॥जैसी काया तैसी छाया।याच प्रकारें देवांचि क्रिया।तैसी नव्हे संतांची चर्या[३]।समसमान सर्वांसी॥८२॥वरकड जनांसमान संत।ऐसी बोलतांचि मात।तो पावेल अधःपात।दुष्टबुद्धि दुरात्मा॥८३॥ समुद्र आणि सौंदणी।तारांगण आणि वासरमणी। कांचोटी आणि महामणी। मेरु मशक[४] सम नव्हे ॥८४॥ थिल्लर आणि गोदावरी। राजा आणि दरिद्री। योगी आणि दुराचारी। कैसी समान होती पैं॥८५॥कस्तूरी आणि कोळसा। केसरी आणि म्हैसा। मनुष्य आणि महेशा। कैसी साम्यता होईल॥८६॥सुपर्ण[८] आणि वायस[९]। पाषाण आणि परीस। बाभळ आणि सुरतरूस[१०]। समानत्व कदां नव्हेचि॥८७॥तैसे संत आणि इतर जन। जे लेखिती समसमान। ते नरदेहासी येऊन। पशू जैसे मूढ पैं ॥८८॥ असो ऐसा संतांचा महिमा। वर्णूं न शके शिवब्रह्मा। संतसंगाच्या सुखाची सीमा। न करवेचि कवणातें॥८९॥ ते संत महाराज सज्जन।ग्रंथारंभीं तयांसी नमन।श्रीवेदव्यास जगद्भूषण।सत्यवतीसुत[११] पैं॥९०॥ज्याचिया मुखकमळा-पासून।चिद्रस[१२] द्रवला परिपूर्ण।त्या वाङ्मय अमृतेंकरून त्रिजग जाण धालें[१३] हो॥९१॥ कीं एकमुखाचा ब्रह्मदेव।कीं साक्षात् द्विबाहु रमाधव।कीं भाललोचन शिव।सत्यमेव अवतरला॥९२॥तो महाराज कृष्णद्वैपायन।अवतरला लोकहिता लागून।

१ अमान्य. २ नरकांत. ३ रीति. ४ नदी, सरोवर. ५ रत्न. ६ माशी. ७ पाण्याचें डबकें. ८ गरुड. ९ कावळा. १० कल्पवृक्षास. ११ व्यास. १२ ब्रह्मरस. १३ तृप्त झालें.

सदा निगमकमल[1] विकास पूर्ण। व्यास चंडांशु[2] देखतां ॥ ९३ ॥ जो वसिष्ठाचा पणतू होय। शक्तीचा पुत्र निःसंशय। त्या पराशर-सुताचें पाहे। महत्त्व कोणा वर्णवे ॥ ९४ ॥ ऐसा तो शुकतात पूर्ण। सत्यवतीचें हृदयरत्न। त्या जगद्गुरूचे चरण। प्रेमभावें वंदिले ॥ ९५ ॥ नमूं तो वाल्मीक आतां। जो शतकोटिग्रंथकर्ता। जो नारदकृपेनें तत्वतां। श्रीरामकथा बोलिला ॥ ९६ ॥ ज्याच्या गोत्रीं जन्मलों स्पष्ट। नमूं तो स्वामी श्रीवसिष्ठ। ज्ञान ज्याचें अति वरिष्ठ। शांतिक्षमेचा सागरु जो ॥ ९७ ॥ दर्भावरी जेणें पृथ्वी धरिली। रविसमान ज्याची शाटी[3] मिरवली। कमंडलु ठेवूनि भूमंडळीं। कुंभोद्भवें नेला साक्षीतें ॥ ९८ ॥ ही कथा सांगावी समस्त। तरी विशेष वाढेल ग्रंथ। ऐसा तो वसिष्ठमुनि समर्थ। नसे अंत ज्ञाना ज्याच्या ॥ ९९ ॥ जेणें उपदेशिला रघुनाथ। तो बृहद्वासिष्ठ श्रेष्ठ ग्रंथ। छतीस सहस्र श्लोक निश्चित। वाल्मीकमुनिकृत पैं ॥ १०० ॥ जो सूर्यवंशाचा आदिगुरु। जो ऋषींमाजी महामेरु। ज्याचे कुळीं व्यासमुनीश्वरू। रमानाथचि अवतरला ॥ १ ॥ त्याच्या उदरीं चिद्रत्न। जन्मला शुक गुणनिधान। तेणें भागवताचें श्रवण। परीक्षितीसी जाण करविलें ॥ २ ॥ नमूं तो स्वामी शुक। जेणें जिंकिले अरि कामादिक। ज्याचें तपोतेज अधिक। तमांतक दूसरा ॥ ३ ॥ शुक असतां शुद्धवनीं। छळूं आली रंभेची भागिनी। ती निस्तेज होऊनि ते क्षणीं। गेली लाजोनी स्वर्गातें ॥ ४ ॥ ज्याच्या मुखीं श्रीभागवत। प्रकटला दिव्य ग्रंथ। जेणें उद्धरिला अभिमन्युसुत। भागवतधर्म सांगोनिया ॥ ५ ॥ बहु पुराणें बहु ग्रंथ। त्यांत मुगुटरत्न भागवत। जैसा सकळांत मुख्य वैकुंठनाथ। तैसाचि ग्रंथ पूज्य हा ॥ ६ ॥ जैसा देवांमाजी सहस्रनयन। कीं द्विजांमाजी सुपर्ण[10]। कीं तारांगणामाजी आत्रिनंदन[11]। तैसें जाण भागवत ॥ ७ ॥ भोगियांमाजी[12] धरणीधर[13]। कीं तपियांत श्रेष्ठ पिनाकधर[14]। कीं नवग्रहांमाजी दिनकर। श्रेष्ठ जैसा विराजे ॥ ८ ॥ कीं हरींमाजी[15] हनुमंत। कीं बोलक्यांमाजी अंगिरासुत[16]। कीं शास्त्रांमाजी वेदांत। मुख्य जैसें मान्य पैं ॥ ९ ॥ आश्रमांत चतुर्थाश्रम[17] पूर्ण। कीं क्षेत्रांमाजी आनंदवन[18]। कीं शस्त्रांमाजी सुदर्शन। तैसें जाण भागवत ॥ ११० ॥ कीं वनचरांमाजी हरि[19] थोर। कीं धनुर्धरांमाजी रघुवीर।

१ वेदरूपीं कमल. २ सूर्य. ३ छाटी, वस्त्र. ४ अगस्ती. ५ अत्यंत श्रेष्ठ. ६ पूर्ण ज्ञानी. ७ परिक्षित राजा. ८ इंद्र. ९ पांखरांत. १० गरुड. ११ चंद्र. १२ सर्पांत. १३ शेष. १४ शंकर. १५ वानरांत. १६ बृहस्पति. १७ संन्यास. १८ काशी. १९ सिंह.

कीं धातूंमाजी शातकुंभ सुंदर। तैसेंचि जाण भागवत ॥ ११ ॥ त्याहीमाजी दशम। केवळ हरिलीला उत्तम। बोलिला व्याससुत परम। हृद्गत गुह्य जें कां ॥१२॥ दशम आणि हरिवंश। अनेक पुराणींच्या कथा विशेष। बोलिले कवि महापुरुष। श्रीकृष्णलीलामृत पैं ॥१३॥ तितुकियांचा जो मथितार्थ। तो हा हरिविजय ग्रंथ। दुजा नाहीं विपरीतार्थ। सत्य सत्य त्रिवाचा ॥१४॥ ऐका हो श्रोते सादर। संपलिया रामअवतार। पृथ्वीवरी दैत्य थोर। मागुती सैरा[2] माजले ॥१५॥ कंस चाणूर मुष्टिक। अघ बक केशी प्रलंबादिक। शिशुपाळ वक्रदंत चैद्यनायक। जरासंध माजला ॥१६॥ जरासंधाच्या बांदिशाळे। बावीस सहस्र राजे पडिले। भौमासुर माजला बळें। लोक[3] चतुर्दश पीडिले ॥१७॥ बाणासुर काळयवन। करिती पृथ्वीचें कंदन[4]। गायी आणि ब्राह्मण। टाकिती मारून दुरात्मे ॥१८॥ कौरव दुष्ट माजले। राक्षस पुन्हा जन्मले। कलीचें स्वरूप सगळें। दुर्योधन जन्मला ॥ १९ ॥ कंस आणि काळयवन। मोडिती ब्राह्मणांचीं सदनें। जो करी विष्णुभजन। त्यासी मारून टाकिती ॥२०॥ न चले अनुष्ठान तप। राहिले ऋषींचें ध्यानतप। वर्तू लागलें थोर पाप। [5]धराकंप जाहला ॥२१॥ गायीच्या स्वरूपें धरित्री। उभी ठाकली ब्रह्मयाच्या द्वारीं। हाक फोडोनि आक्रोश करीं। बुडालें बुडालें म्हणतसे ॥ २२ ॥ मज न सोसवे दैत्यभार। पाप वर्तलें अपार। सकळ विष्णुभक्त द्विजवर। पीडिले फार दैत्यांनीं ॥२३॥ ऐसी पृथ्वी आक्रंदतां। जवळी आला ज[6]गत्पिता। पृथ्वीस म्हणे तूं आतां। चिंता न करी येथोनी ॥ २४ ॥ जैसे पर्जन्यकाळीं गंगेचे पूर। तैसे आले ऋषींचे भार। ब्रह्मयासी म्हणती विप्र। अनर्थ थोर मांडिला ॥२५॥ एक म्हणती कंसें गांजिलें। एक म्हणती काळयवनें पीडिलें। एक म्हणती यज्ञ मोडिले। भौमासुरें चांडाळें॥२३॥ एक म्हणती कन्या धरोनी। गेला भौमासुर घेउनी। स्त्रिया भ्रष्टविल्या दैत्यांनीं। ऐसें पाप अ[7]वनीं वर्तत ॥२७॥ अवघ्या प्रजा येऊन। ब्रह्मयापुढें करिती रुदन। तो कोल्हाळ ऐकोन। विस्मित जाहला परमेष्ठी॥२८॥ देवांसमवेत [8]सहस्रनयन। तोही आला न लागतां क्षण। वंदिले विष्णुपुत्राचे चरण। अतिप्रीती ते वेळीं ॥ २९ ॥

---

१ सोनें. २ चोहींकडे. ३ चौदा भुवनांतील. ४ विध्वंस. ५ भूकंप. ६ ब्रह्मदेव. ७ पृथ्वीवर. ८ इंद्र.

ब्रह्मा म्हणे सहस्त्रनेत्रा[1] । आतां जावें क्षीरसागरा[2] । गाऱ्हाणें सांगावें जगदुद्धारा । तरीच कार्य साधेल ॥ १३० ॥ आतां देव ऋषि प्रजानन । सांगातें घेऊनि चतुरानन[3] । क्षीरसागरा जाऊन । कैसें स्तवन करतील ॥ ३१ ॥ कैसा क्षीरसागरींचा महिमा । कोणे रीतीं तेथें परमात्मा । शौनकादि विप्रोत्तमा । सूत सांगे कथा हेचि ॥ ३२ ॥ परीक्षितीसी सांगे व्यासनंदन[4] । जनमेजयासी[5] सांगें वैशंपायन । तेंच प्राकृत भाषेंत पूर्ण । श्रीधर सांगे श्रोतयां ॥ ३३ ॥ ब्रह्मानंदरूप तुम्ही श्रोते । कथा ऐका सावधचित्तें । जे ऐकतां समस्तें । कलिकिल्मिषें[6] भस्म होतीं ॥ ३४ ॥ इति श्रीहरिविजय ग्रंथ । संमत हरिवंश भागवत । चतुर संत श्रोते ऐकोत । प्रथमोध्याय गोड हा ॥ ३५ ॥ अध्याय ॥ १ ॥

---

१ इंद्रा. २ क्षीरसमुद्राला. ३ ब्रह्मदेव. ४ शुक. ५ परीक्षित राजाचा मुलगा. ६ कलिसंबंधीं पापें.



श्रीगणेशायनमः॥ श्रीकेशवायनमः॥ जय जय यदुकुळकमळदिनकरा[1]। दुरितकाननवैश्वानरा[2]। दितिसुतमर्दनसमरधीरा[3]। इंदिरावरा[4] गोविंदा ॥१॥ सहस्रवक्त्र[5] द्विसहस्रनयन। तो अनंत बोलका विचक्षण[6]। रसना[7] जाहल्या चिरोन। दोन सहस्र तयाच्या॥२॥ मग लाजोनि चक्षुःश्रवा। शय्या तुझी जाहली माधवा। निगम[8] बोलका बरवा। नेती[9] म्हणोनि तटस्थ॥३॥ व्यासवाल्मीकांच्या शिणल्या गती[10]।तटस्थ राहिला बृहस्पती।पंचाननांची[11] कुंठीत मती।गुण तुझे वर्णावया॥४॥तुझें गुण-लक्षण चिदाकाश[12]। तेथें व्यासादिक उडती राजहंस। भेदित गेले आसमास[13]। ज्यांच्या मतीस सीमा नाहीं ॥५॥ त्यांच्या पाठिमागें शलभ[14]। भेदित गेले जी नभ[16]। त्यांची गति न ठाके स्वयंभ[15]।परि आत्मशक्ति उडावें॥६॥ न कळोनि निराळाचा[16] अंत। शक्तीऐसें द्विज[17] क्रमित।तैसा हरिप्रताप अद्‌भुत। परी यथामति वर्णावा ॥७॥ नृपें अर्गजाचें[18] गृह केलें।दुर्बळें मृत्तिकेचें रचिलें।परि साउलीचें सुख न्यून[19]आगळें।नसेचि जैसें सर्वथा॥८॥म्हणोनि श्रीहरीचें गुण।वर्णावे सांडूनि अभिमान। आतां ऐसें पूर्वानुसंधान। पूर्वाध्यायीं काय जाहलें ॥९॥ पृथ्वी प्रजा ऋषिजन। कमलोद्भवासी[20] आले शरण। आक्रोशें करिती रुदन।पीडिलें जाण दैत्यांनीं॥१०॥इंद्रादि देव प्रजा समस्ता। सवें घेऊनि चालिला विधाता[20]। जेथें असे आपला जनिता[21]।क्षीराब्धिशायी सर्वेश॥११॥क्षीराब्धीचा महिमा देखतां दृष्टीं।वर्णिता न सरे वर्षे कोटी।तेथें सर्वांसमवेत परमेष्टी[20] पैलतीरीं उभा ठाके॥१२॥त्या क्षीराब्धीचें मध्यपीठ। तेथें प्रभाकर विशाळ बेट। लक्षानुलक्ष गांवें सुभट[22]। लांब रुंद शोभतसे॥१३॥तेथें निर्विकल्प[23]वृक्ष लागले।चिदाकाशें[11] भेदुनि गेलें।त्या छायेचें सुख आगळें।शिवविरिंचीसी[24] दुर्लभ॥१४॥ दिव्य नवरत्नीं विराजित। मध्यें मंडप शोभिवंत। लक्ष योजनें लखलाखित। ओतप्रोत तितुकाचि ॥ १५ ॥ सूर्यप्रभेसी आणिती उणें। ऐसें जेथें प्रभामय पाषाण। गरुडपाचूंच्या[25] ज्योती पूर्ण। प्रभामय विराजती ॥१६॥ पद्मरागाचे[25] तोळंबे[26] स्वयंभ[15]।वरी दिव्य हिऱ्यांचे खांब। निळ्यांची[25] उथाळी[27] सुप्रभ। उपमा नाही तयांतें॥१७॥जें कां जांबूनद सुवर्ण। त्याची

१ यदुकुलरूपी कमळास प्रफुल्लित करणारा सूर्य. २ पातकरूपी अरण्याला अग्नि अशा. ३ दैत्यांच्या नाशार्थ झालेल्या युद्धांत अत्यंत धीट अशा. ४ विष्णु. ५ शेष. ६ शहाणा. ७ जीभ. ८ वेद. ९ असें नाहीं. १० धाव. ११ शंकराची. १२ चैतन्यस्वरूप आकाश. १३ सर्वत्र. १४ टोळ. १५ मूळचा. १६ आकाशाचा. १७ पक्षी. १८ चंदनाचें. १९ कमीजास्त. २० ब्रह्मदेवास. २१ उत्पन्न करणारा. २२ सुंदर. २३ विकल्परहित. २४ शंकर व ब्रह्मदेव. २५ रत्नाचा एक प्रकार. २६ तुळया. २७ बैठका.

तुळवटें लंबायमान । आरक्त माणिकांचे दांडे जाण । सरळ सुवांड[1] पसरिले॥ १८॥शुद्ध पाचूंच्या किलच्या वरी । अभेद् जोडिल्या कळाकुसरी।दिव्य मुक्तांचा पंके[2] वरी।अक्षय दृढ जडिलासे॥ १९॥जैसे पंक्ती बैसला गभस्ती[3]।तैशा चर्या समान झळकती।नाना चक्रें ओप[4] देती। दिव्य रत्नें अनेक ॥२०॥ मध्यें शिखराचा जो कळस। भेदूनि गेला महदाकाश। सहस्र सूर्यांचा प्रकाश।एकसरां तळपतसे॥ २१॥ निळाच्या मदलेसा[5] जडित।वरी मुक्तांचे राजहंस खेळत। रत्नपुतळ्या गात नाचत।असंख्यात प्रभा त्यांची॥ २२॥दाही अवतार मूर्तिमंत।स्तंभाप्रति शोभले जडित।त्रैलोक्यरचना समस्त।प्रतिमा तेथें साजिऱ्या॥ २३॥मंडपाचे अष्टकोनी ध्वज।सहस्रविजा ऐसे तेजःपुंज।तळपतां तेणें सतेज।ब्रह्मांड समग्र जाहलें॥ २४॥ अनंत ब्रह्मांडांच्या स्थितिगती। रेखिल्या अनंत मूर्ती अनंत शक्ती। त्या मंडपाची पाहतां स्थिती। चंद्र सूर्य खद्योतवत[6] ॥२५॥ऐसा मंडप लक्ष योजन[7]।तितुकाच उंच रुंद चतुष्कोण।चिंतामणीचीं सोपानें[8] पूर्ण।चहूंकडे सतेज॥ २६॥ तयावरी जो तल्पक[9]।शुभ्र सतेज भोगिनायक[10]।जैसा रजताचलें[11] निष्कलंक।असंभाव्य पसरला॥ २७॥असंभाव्य ज्याचें शरीर।मंचक योजनें साठी सहस्र । चतुष्कोण मांव[12] परिकर[13] । निजांगींच शेषाच्या॥ २८॥ठायीं ठायीं उषा बहुवस । निजांगाच्या करी पेश । सहस्रफणांचीं छत्रें विषेश । प्रभा न माये निरोळीं[14] ॥ २९॥ ऐसा शेष जाहला पलंग । वरी पहुडला श्रीरंग । लक्षार्ध योजनें अव्यंग । शेषशायी परमात्मा ॥ ३०॥ इंद्रनीळाचा मेरु पहुडला । कीं परब्रह्मरस ओतिला । भक्तांलागीं आकारला[15] नीलें[16]जीमूतवर्ण पैं॥ ३१॥योजनें पन्नास सहस्र।सगुण लीलाविग्रही[17] श्रीधर।श्रोते म्हणती यास आधार। कोठें आहे सांग पां ॥३२॥तरी ब्रह्मांड पुराणींची कथा अवधारा।नारद गेला होता क्षीरसागरा।तो पाहून आला सर्वेश्वरा। भृगूचिया आश्रमाप्रति ॥ ३३॥ तेणें वर्णिलें हें ध्यान सुरेख । ऐका नारदमुखींचा श्लोक । पहूडला ब्रह्मांडनायक । क्षीरसागरीं कैसा तो ॥३४॥श्लोक॥लक्षार्धं योजनोपेतं विग्रहं कामरुपिणम्। सर्वाश्चर्य मयं देवं शयानं शेषतल्पके॥ १॥टीका॥यालागीं लक्षार्ध योजनें प्रमाण। पहुडला नीलजीमूतवर्ण[16]। कोटी मदन ओवाळून। नखांवरून सांडिजे॥ ३५॥ घनश्याम कमलनयन। जें

१ सुंदर. २ चिखल, रांधा. ३ सूर्य. ४ उजाळा. ५ छत. ६ काजव्याप्रमाणें. ७ लांबी मोजण्याचें माप. ८ पायऱ्या. ९ पलंग. १० शेष. ११ रुप्याचा पर्वत. १२ मायावी. १३ अंगण, सभोंवतालीं. १४ आकाशांत. १५ सगुणरूप झाला. १६ मेघाप्रमाणें शाम. १७ लीलेनें देह धारण करणारा.

मायातीत[1] शुद्ध चैतन्य । जें पूर्णब्रह्म सनातन[2] । क्षीरसागरीं पहुडलें ॥ ३६ ॥ श्रीवत्सां[3]कितभूषण । हृदयीं कौस्तुभ-प्रभा घन । मुक्तामाळा विराजमान । वैजयंती[4] आपाद[5] ॥३७॥ कल्पांतींचे सहस्र आदित्य । तैसी दिव्य मूर्ति प्रकाश-वंत । परम जाज्वल्य कुंडलें तळपत । मकराकार[6] उभयकर्णीं ॥३८॥ कल्पांतींच्या सहस्र विजा पूर्ण । तैसा मुगुट-प्रकाश गहन । सरळ नासिक विशाल नयन । धनुष्याकृति भृकुटिया[7] ॥३९॥ अनंत ब्रह्मांडींचें सौंदर्य एकवटलें । संतापनाशक हें रूप ओतिलें । कीं कैवल्यसुख[8] गोळा जाहलें । क्षीरसागरीं प्रत्यक्ष ॥४०॥ कौस्तुभतेजें क्षीरसागर । लखलखिला देदीप्यमान सुंदर । नाभि वर्तुळ गंभीर[9] । बालदिवाकरप्रकाश जैसा ॥४१॥ शंख चक्र गदा पद्म । परम उदार घनश्याम । जो अनंत पुराण पुरुषोत्तम । पूर्णकाम सर्वेश ॥४२॥ चहूं भुजीं कीर्तिमुखें[10] । मणगटीं हस्तकंटकें सुरेखें । दशांगुळीं मुद्रिकांचें तेज फांके । असंभाव्य न वर्णवे ॥४३॥ नाभिस्थानीं दिव्य कमळ । त्यांत चतुर्मुख[11] खेळे बाळ । सहस्र वरुषें कमलनाळ । शोधितां अंत न सांपडे ॥४४॥ सहस्र विजांचा एक भार । तैसा नेसला पीतांबर । त्या सुवासें अंबर । परिपूर्ण धालें हो ॥४५॥ हरितनूचा सुवास पूर्ण । जाय ब्रह्मांड भेदून । कटीं मेखळा[12] विराजमान । दिव्य रत्नीं झळकतसे ॥४६॥ माजी क्षुद्रघंटांची[13] दाटी । अंगीं दिव्य चंदनाची उटी । श्यामवर्ण जगजेठी । चंदन जैसा वरी शोभे ॥४७॥ सांवळें सूर्यकन्येचें[14] नीर । त्यावरी भागीरथीचें शुभ्र । कीं नीळवर्ण अंबर[15] । त्यावरी चांदणें पौर्णिमेचें ॥४८॥ नभाचे गाभे काढिले । तैसे जानुजंघन[16] शोभले । चरणीं तोडर खळाळे । वांकीं नेपुरें रुणझुणती ॥४९॥ कोटी चंद्र एकवटले । चरणनखीं सुखावले[17] । कीं स्वशरीराचीं करूनि दहा शकलें[18] । दशांगुळीं जडिलीं हो ॥५०॥ दिव्य मुक्तपल्लव रुळत । ऐसा दुजा पीतांबर झळकत । पांघरलासे दीनानाथ । शेषशायी परमात्मा ॥५१॥ अंगींच्या प्रकाशशिखा[19] पूर्ण । जाती सप्तावरण भेदून । ज्याच्या श्यामप्रभेनें घन[20] । अद्यापि सांवळा दिसतसे ॥ ५२ ॥

१ मायेच्या पलीकडे राहणारें. २ अनादि. ३ छातीवरील भृगुमुनीच्या लाथेनें चिन्हरूपीं भूषण. ४ भगवंताच्या गळयांतील माळेचें नांव. ५ पायापयत. ६ माशाच्या आकारांचीं. ७ भिंवया. ८ मोक्षसुख. ९ खोल. १० अलंकारविशेष. ११ ब्रह्मदेव. १२. करगोटा. १३ बारीक घागऱ्यांची. १४ यमुनेचें. १५ आकाश. १६ गुडघे व मांड्या. १७ सुखानें राहिले. १८ तुकडे. १९ प्रकाश झोत. २० मेघ, ढग.

क्षीरसागरींचा श्याम प्रकाश पडला । तोचि हा नभासी रंग चढला । होचि सुनीळतां डोळां । अद्यापि वरी दिसतसे ॥५३॥ क्षीरसागरीं जगदुद्धार[1] । मंदस्मितवदन[2] सुंदर । दंतपंक्तींच्या तेजें थोर । कोटिसूर्य प्रकाशले ॥ ५४ ॥ सर्व आनंदाचें सदन । मिळोनि ओतिलें हरीचें वदन । एवढी प्रभा देदीप्यमान । परी तीव्र नव्हे सर्वथा ॥५५॥ तें तेज शांत सोज्ज्वळ[3] । तीक्ष्ण नव्हे परम शीतळ । पुरी स्थूळ दृष्टीचें बळ । पहावया तेथें चालेना ॥ ५६ ॥ तेथें प्रत्यक्ष लक्ष्मीस दर्शन । आदर्शबिंबवत[4] विधीसें[5] जाण । माध्याह्नींचा सूर्य पूर्ण । तैसा ऋषींसी दिसतसे ॥ ५७ ॥ मानवी भक्तांचिये ध्यानीं । प्रकटे साक्षात येऊनी । यालागीं क्षीरसागरींचें रूप नयनीं । कोणासही न पाहवे ॥५८॥ ज्ञान-दृष्टीं जे पाहत । त्यांसी जवळी आहे भगवंत । अभक्तांसी न दिसे सत्य । कोटी वर्षें शोधितां ॥ ५९ ॥ असो आतां त्या अवसरीं । क्षीरसागरीच्या ऐलतीरीं[6] । बद्धांजलि करूनि निर्धारीं । सुरवर उभे ठाकले ॥६०॥ पुढें मुख्य आधीं परमेष्ठी[7] । इंद्रादि देव उभे त्यापाठीं । जयजयकाराच्या बोभाटीं । ऋषी गर्जती ते वेळीं ॥६१॥ ॐनमो आदिनारा-यणा । लक्ष्मीनारायणा मनमोहना । महाविष्णु मधुसूदना । कैटभारि केशवा ॥६२॥ जय जय वैकुंठपीठविहारा । शेषशायी विश्वंभरा[8] । पुराणपुरुषा रमावरा[9] । धांवें त्वरें ये वेळीं ॥६३॥ जय जय वेदोद्धारका । कूर्मरूपा सृष्टिपाळका । नमो सकळ दैत्यांतका । दीनरक्षका दीनबंधो ॥६४॥ जय जय हिरण्यकशिपुमर्दना । नमो त्रिविक्रमा[10] बलिबंधना । नमो ब्राह्मणकुलपालना । नमो श्रीधरा गोविंदा ॥ ६५ ॥ नमो पौलस्तिकुलकाननदहना[11] । नमो मीनकेतनारिहृदय-जीवना[12] । नमो चतुर्दशलोकपालना । पीतवसना माधवा ॥६६॥ जय जय कमळनयना कमळावरा । कमळशयना कमळवक्त्रा । कमळनाभा कमळ छत्रा । कमळधरा कमलाप्रिया[13] ॥ ६७ ॥ जय जय विश्वपाळणा । विश्वव्यापका विश्वकारणा । विश्वमतिचालका विश्वजीवना । विश्वरक्षणा विश्वेशा ॥ ६८ ॥ जय जय लक्ष्मीकुचकुंकुमांका ।

---

१ जगाचा उद्धार करणारा, विष्णु. २ गालांतल्यागालांत हंसणारा. ३ लखलखित. ४ आरशांतील प्रतिबिंबासारखें. ५ ब्रह्मदेवास. ६ अलीकडच्या काठीं. ७. ब्रह्मदेव. ८ जगाचें पोषण करणाऱ्या. ९ लक्ष्मीपते. १० वामना. ११ रावणाच्या कुलरूपी वनाचा नाश करणाऱ्या. १२ मदनशत्रु शंकराच्या अंतःकरणाला आनंदविणाऱ्या. १३ लक्ष्मीपते.

जय सकळदेवविस्तारका । जय सकळदेवपाळका । सकळदेवदीक्षागुरो ॥ ६९ ॥ नमो निर्जरललाटपट्टलेखना[1] । नमो सनकसनंदनमनोरंजना । नमो दानवकुलनिकृंतना[2] । भवभंजना भवहृदया ॥ ७० ॥ नमो मायाचक्रचाळका । नमो अज्ञानतिमिरांतका । नमो वेदरूपा वेदपाळका । वेदस्थापका वेदवंद्या ॥७१॥ नमो भवगज पंचानना । नमो पापारण्य कुठारतीक्ष्णा । नमो त्रिविधतापदाहशमना । अनंतशयना अनंता ॥७२॥ नमो दशावतारचरित्रचाळका । नमो अनंतवेषधारका । नमो अनंतब्रह्मांडनायका । जगदुद्धारका जगत्पते ॥ ७३ ॥ नमो सर्गस्थित्यंतकारका[3] । नमो कैवल्यपददायका[4] । अज आजित सर्वात्मका । करुणालया सुखाब्धे ॥७४॥ नमो जन्ममरणरोगवैद्या । सच्चिदानंदा स्वसंवेद्या[5] । मायातीता जगद्वंद्या । भेदाभेदातीत तूं ॥७५॥ नमो षड्विकाररहिता[6] । नमो सकलषड्गुणालंकृता । नमो आरिषड्वर्गच्छेदक प्रतापवंता । शब्दातीता निरंजना ॥७६॥ वृषभाचे नाकीं वेसणी । घालूनि भोंवंडी अखंड धरणीं । तैसे तुझ्या सत्तेंकरूनी । सकळ देव वर्तती ॥७७॥ तुझें शिरीं धरूनि शासन । वर्ततों तुझी आज्ञा पाळून । ऐसें असतां दैत्यीं विघ्न । पृथ्वीवरी मांडिलें ॥७८॥ कंसचाणूरादि दैत्य माजले । काळयवनें यज्ञ मोडिले । जरासंधें थोर पीडिलें । बंदीं घातले धर्मिष्ट नृप ॥ ७९ ॥ मारिलें गाई ब्राह्मण । विष्णुभक्ता ओढवलें विघ्न । धर्म टाकिले मोडून । पृथ्वी संपूर्ण गांजिली ॥८०॥ ऐसियासी काय विचार । तूं दयार्णव जगदुद्धार । ऐसें बोलोनि विधि[7] सुरवर । तटस्थरूप पाहती ॥ ८१ ॥ तों क्षीरसागराहूनी । उठली अंतरिक्षध्वनी[8] । नाभीनाभी[9] म्हणोनी । चिंता मनीं करूं नका ॥ ८२ ॥ मी यादवकुळीं अवतार । घेऊन करीन दुष्टसंहार । तुम्ही देव समग्र । यादव होऊनि येइजे ॥ ८३ ॥ आणिक जे उपदेव सकळ । त्यांहीं गोकुळीं व्हावें गोपाळ । ऋषीं वत्स व्हावें सकळ । मी पाळून उद्धरीन ॥८४॥ धर्म[10] समीर[11] सहस्रनयन[12] । अश्विनौदेव[13] दोघे जण । यांहीं कुंतीउदरीं अवतरून । भूभारहरण करावें ॥ ८५ ॥ बृहस्पतीनें व्हावें द्रोण ।

---

१ देवाच्याही भालपटलाचा लेख लिहिणाऱ्या. २ दानवकुळाचा समूळ नाश करणाऱ्या. ३ उत्पत्ति, पालन व नाश करणाऱ्या. ४ मोक्ष देणाऱ्या. ५ स्वस्वरूपानें जाणण्यास योग्य. ६ सहा विकारांविरहित. ७ ब्रह्मा. ८ आकाशवाणी. ९ भिऊं नका, भिऊं नका. १० यम. ११ वायु. १२ इंद्र. १३ अश्विनीकुमार.

द्यावें पांडवासी विद्यादान । अग्नीनें व्हावें धृष्टद्युम्न । पांचाळाचे[1] निजयागीं ॥ ८६ ॥ कलह माजवावया आधीं । पार्वतीनें व्हावें द्रौपदी । लक्ष्मी रुक्मिणी त्रिशुद्धी[2] । वैदर्भउदरीं[3] अवतार ॥८७॥ बळिभद्र होईल संकर्षण । वसुदेव देवकी दोघेजण । मी त्यांच्या पोटीं अवतरोन । करीन पावन तयांसी ॥८८॥ तीन जन्मपर्यंत । त्यांहीं तप केलें बहुत । तें फळा आलें समस्त । मी होईन सुत तयांचा ॥ ८९ ॥ ऐसी अंतरिक्षीं[4] होतां ध्वनी । देवीं जयजयकार करूनी । नमस्कार साष्टांग घातला धरणीं । आनंद मनीं न समाये ॥९०॥ ते शब्द देवास कैसे वाटले । कीं सुखाचे सागर लोटले । कीं चातकांसी[5] ओळले[6] । मेघ जैसे आकाशीं ॥९१॥ जन्मवरी[7] दरिद्रें पीडिला । त्यासी धनाचा कूप[8] सांपडला । कीं मरे तयासी जोडिला । सुधासिंधु[9] अकस्मात ॥ ९२ ॥ कीं जननी[10] चुकोनि गेली । ते बाळकासी जैसी भेटली । कीं तृषाक्रांतें[11] देखिली । भागीरथी अकस्मात ॥९३॥ कीं जन्मांधासी आले नयन । कीं रोगिया जोडलें दिव्य रसायन[12] । कीं वणव्यांत जळतां पूर्ण । अद्भूत घन[13] वर्षला ॥९४॥ कीं वांचवावया लक्ष्मण । हनुमंतें आणिला [14] गिरि द्रोण । वानर सुखावले देखोन । तैसेच देव हर्षले ॥९५॥ कीं अयोध्येसी आला रघुनाथ । देखोनि आनंदला भरत । तैसेंच देव समस्त । ब्रह्मानंदे कोंदले[15] ॥९६॥ आनंद जाहला सकळां । देव पावले स्वस्थळा । चिंतेचा दुष्काळ गेला । सुखसोहळा थोर वाटे ॥ ९७ ॥ इकडे यदुवंशीं शूरसेन । त्यासी जाहलें पुत्रनिधान । आनकदुदुंभि नाम पूर्ण । वसुदेव तोचि जाण पां ॥९८॥ वसुदेवाच्या जन्मकाळीं । देवीं दुंदुभि[16] वाजविल्या निराळीं[17] । आनकदुंदुभि नाम ते वेळीं । वसुदेवासी ठेविलें ॥९९॥ दुंदुभी वाजवावयाचें कारण । याचे पोटीं वासुदेव आपण । अवतरेल हें जाणून । देवीं दुंदुभी वाजविल्या ॥ १०० ॥ याचे उदरीं अवतरेल वासुदेव । म्हणोन नांव ठेविलें वसुदेव । त्याचा आरंभिला विवाह । मथुरेमाजी गजरेसीं[18] ॥१॥ उग्रसेन मथुरानाथ । कंस दुरात्मा त्याचा सुत । परी तें पितृरेत नव्हे निश्चित । अन्यवीर्य मिसळलें ॥२॥ उग्रसेनाची स्त्री पतिव्रता । परमसात्विक शुचिस्मिता । एक दैत्य आला अवचितों[19] । तेणें

१ द्रुपदांचे. २ खरोखर. ३ भीमक राजाचे पोटीं. ४ आकाशांत. ५ चातक नांवाच्या पक्ष्याला. ६ वळले. ७ जन्मभर. ८ सांठा. ९ अमृताचा समुद्र. १० आई. ११ तान्हेल्यानें. १२ औषधी मात्रा. १३ पाऊस. १४ पर्वत. १५ भरून गेले. १६ मोठे नगारे. १७ आकाशांत. १८ थाटानें. १९ एकाएकी.

उचलोन ते नेली ॥३॥ अरण्यांत नेऊन बळें । सती भोगिली चांडाळें । मग दैत्य म्हणे ते वेळे । पुत्र तुज होईल ॥४॥ मग सती काय बोले बोल। तुझा पुत्र जो कां होईल । त्यासी श्रीकृष्ण वधील । आपटोन क्षणमात्रें ॥५॥ सती देखोनि क्रोधायमान । दैत्य पळाला टाकून । त्यावरी कंस दुर्जन । पुत्र जाहला तोचि पैं ॥६॥ सदां पितयासी द्वेषी। देखों न शके मातेसी । यादवांसी उपहासी । संगतीसी राहूं नेदी ॥७॥ बापास मागें लोटून । स्वइच्छें राज्य करी आपण । विष्णुभक्त गाई ब्राह्मण । त्यांसी आणूनि जिवें मारी ॥८॥ दैत्य जे का दुष्ट दुर्जन । तेच केलें आपुले प्रधान । गांवांतून गेले सज्जन । अधर्म पूर्ण वर्तला ॥९॥ नरकींचे राहणार किडे । त्यांसी दुर्गंधीच बहु आवडे । विष्ठा देखोनि सुरवांडे[2] । काक[3] जैसा दुरात्मा ॥११०॥ जो मद्यपी दुर्जन । त्यासी नावडे तत्त्वज्ञान[5] । दिवांभीतालागून[6] । नावडे दीन[7] सर्वथा ॥११॥ शशी[8] नावडे तस्करा[9] । सत्संग नावडे पापी नरा । हिंसकाचिया अंतरा । दया कैंची उद्भवे ॥ १२ ॥ कृपणासी नावडे धर्म । स्त्रीलुब्धा[10] नावडे सत्कर्म । निंदकासी नावडे प्रेम । भजनमार्ग सर्वथा ॥ १३ ॥ कीर्तन नावडे भूतप्रेतां । दुग्ध नावडे नवज्वरितां । टवाळासी तत्त्वतां । जपानुष्ठान[11] नावडे ॥१४॥ तैसें कंसें मथुरेस केलें । धर्म सत्कर्म बुडालें । दैत्य अवघे मिळाले । कंसाभोंवते सर्वदा ॥१५॥ मुष्टिक आणि चाणूर । केशी प्रलंब अघासुर । जळासुर दुराचार । असुरासुर पापात्मा ॥१६॥ कागासुर आणि खर। शल तोशल धेनुकासुर । परम निर्दय अरिष्टासुर । व्योमासुर महाक्रोधी ॥१७॥ परम सुंदर लोकमान्या । उग्रसेनासी जाहली कन्या । देवकी नामें परम धन्या । सर्वलक्षणीं युक्त जे ॥१८॥ जैसा शुक्लपक्षींचा चंद्र । तैशी ते वाढे सुकुमार । देखोनियां उपवर[12] । वसुदेव वर नेमिला ॥१९॥ निजभारेंसीं[13] शूरसेन । मथुरेसी आला करावया लग्न।सामोरे जाऊन कंस उग्रसेन । सीमांतपूजा त्या केली॥१२०॥ परम सुंदर वसुदेव वर । पुढें भेरी धडकती चंद्राननां[14] थोर।मुखद्वयाचे गंभीर।मृदंग वाद्यें गर्जती ॥२१॥ मुखवायूचें लागता बळ।सनया गर्जती रसाळ।झल्लरी टाळ घोळ । पणव ढोल गर्जती ॥२२॥ तंत[15]वितंत घन सुस्वर।चतुर्विध वाद्यांचा गजर।लोक पहावया येती समग्र । वसुदेव

१ निंदा करी. २ आनंद पावतो. ३ कावळा. ४ दारूबाज. ५ आत्मानात्मविचार, खरें ज्ञान. ६ घुबडास. ७ दिवस. ८ चंद्र. ९ चोरास. १० स्त्रीलंपटाला. ११ गायत्रिआदि जप व शिवाभिषेकादि अनुष्ठान. १२ लग्नाला योग्य. १३ आपल्या सैन्यासहवर्तमान. १४ चंद्राकृति. १५ तंतुवाद्यें.

वर कैसा हें ॥२३॥ जानवशासी घर । दिधलें विशाळ सुंदर । देवकप्रतिष्ठा करूनि सत्वर । लग्नघटिका घातली ॥२४॥ मिरवत आणिला वसुदेव । अंबरीं[2] हर्षले सकळदेव । याच्या पोटीं अवतरेल वासुदेव । सत्य शब्द हा एक ॥२५॥ ज्याच्या पोटीं येईल जगज्जीवन । त्याची पूजा करी उग्रसेन । यथाविधि पाणिग्रहण । केलें बहुत आनंदें ॥२६॥ दोन सहस्त्र दासी आंदण । दिधले लक्ष एक वारण[3] । पवनवेगी[4] तुरंग[5] साहितआभरण[6] । दोन लक्ष दीधले ॥२७॥ मिरवावया दोघे वधूवरें[7] । वरात काढिली कंसासुरें । रथावरी बैसविलीं ओहरे । आपण धुरे[8] सारथी जाहला ॥२८॥ पुढें होती वाद्यांचे गजर । दारुनाळियांचे भडिमार । चंद्रज्योती चंद्राकार । तेजें अंबर प्रकाशे ॥२९॥ आपण कंस जाहला सारथी । पुढें वेत्रपाणी[9] लोकांस सारिती । रथ चालवावया वाव[10] करिती । कंसाच्या चित्तीं सुख वाटे ॥ १३० ॥ तों अकस्मात् तये वेळीं । देववाणी गर्जे निराळीं[11] । लोक तटस्थ सकळीं । वाद्यें राहिलीं वाजतां ॥३१॥ म्हणे रे कंसा निर्दैवा । खळा धरितोस बहुत हावा[12] । परी देवकीचा पुत्र आठवा । तुज वधील निर्धारें ॥३२॥ ऐसें ऐकतां श्रवणीं । कंस दचकला अंतःकरणीं । म्हणे आतां कासयाची भगिनी । टाकूं वधोनि येथवां ॥३३॥ वेणीसी देवकी धरिली । आसडोनि[13] रथाखालीं पाडिली । जैसी रंभा[14] ताडिली । शुंडादंडें वारणें[15] ॥ ३४ ॥ कीं कमळिणी सुकुमार । धक्का लागतां होय चूर । कीं शिरसफूल अरुवार[16] । क्षणमात्रें कुंचुंबे[17] ॥३५॥ कंसें शस्त्र उपसिलें । देवकीच्या मानेवरी ठेविलें । करुणास्वरें ते वेळे । देवकी बोले बंधूसी ॥ ३६ ॥ अरे तूं कंसा माझा बंधु प्रसिद्ध । काय देखिलासी सख्या अपराध । कां रे करितोसी माझा वध । बंधुराया सुजाण ॥ ३७ ॥ बा रे तूं माझ्या कैवारिया । कां कोपलासी कंसराया । म्हणोनि देवकी लागे पायां । करुणास्वरें रुदन करी ॥३८॥ हिंसकें[18] धरिली जेविं गाय । कंठीं सुरी घाली निर्दय । कीं व्याघ्रें महापापियें । हरिणी ग्रीवे[19] धरियेली ॥३९॥ करुणास्वरें आक्रंदे सुंदर । परी न सोडीच दुराचार । विदेहकन्या[20] नेतां दशकंधर[21] । न सोडी

१ नवरा उतरण्यास. २ आकाशांत. ३ हत्ती. ४ वाऱ्याप्रमाणें जलद चालणारे. ५ घोडे. ६ अलंकारासह. ७ नवरा व नवरी. ८ रथाच्या दांडीवर. ९ चोपदार. १० जागा, शिरकाव. ११ आकाशांत. १२ हव्यास. १३ हिसकावून. १४ केळ. १५ हत्तीनें. १६ नाजुक. १७ कोमेजतें. १८ पशुहत्या करणारानें. १९ मानेला. २० सीता. २१ रावण.

जैसा दुरात्मा ॥ १४० ॥ देखोन देवकीची करुणा । अश्रु आले जनांच्या नयना । परम खेद उग्रसेना । दुःखार्णवीं बुडतसे ॥४१॥ म्हणे रे कंसा चांडाळा । कां वधिसी माझी वेल्हाळा[1] । माझ्या गळ्याची चंपकमाळा । रुळत[2] पडली भूतळीं ॥४२॥ माझ्या हृदयींचें दिव्य रत्न । लज्जापंकीं[3] गेले बुडोन । माझें सुढाळ मुक्त जाण । दावाग्नींत[4] पडियेलें ॥ ४३ ॥ माझी सुकुमार सुमनकळी[5] । पडली जनांच्या पायातळीं । कबरीवरी[6] पडली धुळी । म्लान मुख दिसतसे ॥४४॥ तुटली शिरींची मुक्तजाळी । बिजवरा[7] पडिला भूमंडळीं । वदनचंद्रा लागली धुळी । मुक्तें विखुरलीं कंठींचीं ॥४५॥ जाहला एकचि हाहाःकार । रडती समस्त नारीनर । रथाखालीं शूरसेनकुमर[8] । उडी टाकोनी पातला ॥४६॥ येऊनि धरी कंसाचा हात । म्हणे स्त्री वधितां पाप बहुत । या पापासी नाहीं गणित । धर्मशास्त्रीं बोलिलें ॥४७॥ एक रथभरी वधितां किडे । एक मेषवधाचें[9] पाप घडे । शत मेष मारितां पडे । एक वृषभहत्या[10] पैं ॥४८॥ शत वृषभ वधिले । एक गोहत्येचें पाप घडलें । शंभर गोवधांहून आगळें । ब्रह्महत्येचें पाप पैं ॥४९॥ शत ब्रह्महत्यांचें पाप जाण । एक स्त्रीहत्येसमान । कंसराया तूं परम सुजाण । स्त्रीदान मज देईं ॥१५०॥ कंस म्हणे इचा पुत्र देख । माझिया जीवाचा घातक । मी ईस वधीन आवश्यक । म्हणोनि शस्त्र उचलिलें ॥५१॥ वसुदेव म्हणे घेईं भाक । जो मज सुत[11] होईल देख । तो तुज देईन निःशंक । त्रिवाचा हे सत्य पैं ॥५२॥ भाक देऊनि ते वेळीं । सोडविली ते वेल्हाळी । अश्रु वाहती नेत्रकमळीं । अधोवदनें[12] स्फुंदत ॥५३॥ सोहळ्यामाजी अनर्थ । जैसें दुग्धामाजी सैंधव[13] पडत । कीं दिव्य अन्नामाजी कालवत । विष महादुर्धर ॥५४॥ कीं सुमनशेजे[14] अरुवारी[15] । पहुडला[16] दिव्य मंदिरीं । तों तें घर आंगावरी । अकस्मात पडियेलें ॥५५॥ कीं द्रव्याचा घट लाधला । म्हणोन कर[17] आंत घातला । तों तेथें भुजंग प्रकटला । तेणें डंखिलें क्षणमात्रें॥५६॥ साधावया जातां निधान[18] । तों विवशी[19] पडे गळां येऊन । कीं उपजतां वैराग्यतत्वज्ञान । प्रारब्ध आडवें धांवत ॥५७॥ तैसें कंसें केलें ते वेळां । कैंचे साडे कैंचा सोहळा । भगिनी शालक[20] उभयतांला । बंदिशाळे रक्षिलें ॥५८॥ श्रृंखळा[21]

---

१ आवडती, प्रिय. २ लोळत. ३ लज्जारूपीं चिखलांत. ४ वणव्यांत. ५ फुलाची कळी. ६ वेणीवर. ७ कपाळावरील दागिना. ८ वसुदेव. ९ मेंढ्याचें. १० बैलाचा वध. ११ पुत्र. १२ खालीं तोंड करून. १३ मीठ. १४ फुलांच्या शेजेवर. १५ मऊ, कोमळ. १६ निजला. १७ हात. १८ गुप्त धन. १९ हडळ. २० मेहुणा. २१ बेड्या.

घालून उभयतांप्रती । रक्षण दृढ ठेवी भोंवती । जैसे चंदनासी रक्षिती । महाभुजंग सर्वदा ॥५९॥ ऐसी कंसें केली करणी । तंव देवकी जाहली गर्भिणी । परम चिंता वाटे मनीं । तंव ते प्रसूत जाहली वो ॥१६०॥ जाहला प्रथमचि पुत्र । परम सुंदर सुनेत्र । बाळ घेऊनि पवित्र । मुख पाहिलें वसुदेवें ॥६१॥ मग वसुदेव बोले वचन । बाळा तुजला आलें रे मरण । देवकीचे आसुवें नयन । भरले तेव्हां सद्गद ॥६२॥ वसुदेव म्हणे प्रभाण । कंसासी दिधलें भाकदान । देवकी म्हणे नेऊन । अवश्य द्यावें स्वामिया ॥६३॥ वसुदेवें उचलिलें बाळ । भडभडां वाहे अश्रुजळ । तों कंसासी कळलें तात्काळ । आणवी बाळ क्षणमात्रें ॥६४॥ तों देवकी म्हणे वसुदेवा । तुम्हीं पुत्र तेथें न्यावा । जरी कृपा आली बंधुवा । तरी एवढें सोडील ॥६५॥ बाळ घेवोनि वसुदेव चालिला । परम मुखचंद्र उतरला । पायीं तैसीच शृंखळा । वाजे खळखळा चालतां ॥६६॥ श्मश्रुकेश बहु वाढले । नखांचे गुंडाळे वळले । आंग परम मळलें । शेणें घोळिलें मुक्त जैसें ॥६७॥ कीं केतूनें व्यापिला दिनकर । कीं राहूनें आच्छादिला क्षीराब्धिपुत्र । तैसा वसुदेव पवित्र । जातां दिसे म्लान पैं ॥६८॥ मागें पुढें रक्षिती सेवक । कंसापाशीं आणिलें बाळक । रायापुढें ठेविलें देख । शूरसेनसुतें ते वेळीं ॥६९॥ बाळक सुंदर देखिला । कंसासी स्नेह दाटला । मग प्रधानासी ते वेळां । काय बोलिला कंस तो ॥१७०॥ म्हणे जो आठवा होईल सुत । तोचि असुचा शत्रु निश्चित । हे कासया वधावे सात । याचे यास असोत हे ॥७१॥ कंस म्हणे वसुदेवा । हा आपुला तुम्हीं बाळ न्यावा । मुख्य आम्हांसी आठवा द्यावा । तो मीच वधीन स्वहस्तें ॥७२॥ ऐसें ऐकतांचि उत्तर । परतला शूरसेनकुमर । मनीं म्हणे नवल थोर । खळासी उपजला सद्भाव ॥७३॥ म्हणे गोड कैसें जाहलें हालाहल । जातवेद कैसा जाहला शीतळ । पन्नगाच्या मुखींचें गरळ । सुधारसतुल्य जाहलें ॥७४॥ पाषाणाचें हृदय द्रवलें । वृश्चिकें साधुपण धरिलें । कंटकशेजे निवाले । आंग आजी वाटतें ॥७५॥ मद्यपियासी उपजलें ज्ञान । हिंसक जाहला दयाघन । महाकृपणें सकळ धन । दान आजी दीधलें ॥७६॥ व्याघ्रें धरिली आजि शांति । खळासी उपजली हरिभक्ति । वज्रधार निश्चिती । नम्र आजी वाटतसे

१ वचन. २ हजामत. ३ सूर्य. ४ चंद्र. ५ व्याकुळ. ६ काळकूट विष. ७ अग्नि. ८ सर्पाच्या. ९ अमृतप्रमाणें. १० विंचवानें. ११ दारुबाजाला. १२ शस्त्राची तीक्ष्णधार.

॥७७॥ वसुदेव वेगें ते वेळे। प्रवेशला हो बंदिशाळे। देवकीपाशीं बाळ दिधलें। सांगितलें वर्तमान ॥७८॥ देवकीसी संतोष वाटला। जैसा प्राण जातां परतला। तंव तो नारद ते वेळां। येतां जाहला कंससभे ॥७९॥ नारदातें कंसें पूजिलें। सकळ वर्तमान निवेदलें। नारद म्हणे भुललें। चित्त कां तुझें कंसराया ॥१८०॥ तुवां सोडिलें वसुदेवसुता। परी तुझा शत्रु कोणता। आठांपासून उफराटें गणितां। तरी पहिलाच शत्रु तुझा ॥८१॥ दुसरा कीं तिसरा चौथा। शत्रु तुझा रे तत्त्वतां। आठांमध्यें तुझ्या घाता। प्रवर्तेल कोण तो न कळे ॥८२॥ ऐकोनि ब्रह्मसुताचें[1] वचन। कंसें तुकाविली मान। सरडा कंटकवृक्षीं बैसोन। ग्रीवा[2] जैसी हालवी ॥८३॥ नारद हितशत्रु[3] होय। हित सांगोन करवी क्षय। बाळहिंसा करितां पाहे। अल्पायुषी होय तो ॥८४॥ कुलक्षय होऊनि राज्य बुडे। ऐसे नारद सांगे निवाडे। कंसासी ते बुद्धि आवडे। म्हणे बरवें कथिलें जी ॥८५॥ कंस क्रोधें धाविन्नला। बंदिशाळेमाजी आला। जैसा तस्कर[4] संचरला। धनाढ्याचे निजगृहीं ॥८६॥ कीं देवघरीं रिघे श्वान[5]। कीं मूषकबिळीं[6] व्याळ[7] दारुण। कीं होमशाळेमाजी मळिण। अंत्यज[8] जैसा पातला ॥८७॥ कीं हरिणीचें पाडस सुकुमार। न्यावया आला महाव्याघ्र। कीं गोवत्स देखोनि सुंदर। वृकें[9] जैसा धाविन्नला ॥८८॥ ऐसा बंदिशाळेमाजी आला। देवकीसी काळच भासला। बाळ हृदयीं दृढ धरिला। आच्छादिला निजपल्लवें[10] ॥८९॥ कोठें गे कोठें बाळ। म्हणोनि बोले चांडाळ। देवकी म्हणे तूं स्नेहाळ। बंधुराया सुजाणा[11] ॥१९०॥ ओटी पसरी म्लानवदन। येवढें दे मज पुत्रदान। म्हणोनि धरिले चरण। निर्दयाचे तेधवां ॥९१॥ कंसें बळें हात घालूनी। बाळ धरिला दृढ चरणीं। येरी आरडत पडे धरणीं। केळी जैसी चंडवातें[12] ॥९२॥ द्वारीं होती चंड शिळ। तिजवरी निर्दयें आपटिलें बाळ। तें छिन्नभिन्न जाहलें तात्काळ। पक्क फळासारिखें ॥९३॥ दुर्जनासी कैंची दया। वाटपाड्यासी कैंची माया। उपरति[13] पैशून्यवादिया[14]। कदाकाळीं नव्हेचि ॥९४॥ ऐसें मारून तें बाळ। निघोन गेला कंस खळ। मागुती गरोदर झाली ते वेल्हाळ। दुसऱ्यानें प्रसूत जाहली ॥९५॥ स्वयें येऊन आपण। तेंही मारिलें

---

१ नारदाचें. २ मान. ३ हित दाखवून घात करणारा. ४ चोर. ५ कुत्रा. ६ उंदराचे बिळांत. ७ सर्प. ८ महार. ९ लांडगा. १० आपले हातानें. ११ शहाणा. १२ सोसाट्याचे वाऱ्यानें. १३ पश्चात्ताप, वैराग्य. १४ पाखंड्याला.

आपटून । तिसरें जाहलें सगुण । तेंही मारिलें क्षणार्धे ॥९६॥ चौथें पांचवें साहावें नेटें[1] । तेही लाविले मृत्युवाटे । वसुदेवाचें दुःखें हृदय फुटे । म्हणे कर्म मोठें दुर्धर ॥९७॥ कंसें सहा गर्भ वधिले । पाप असंभाव्य[2] सांचले । गाई विप्र[3] भक्त गांजिलें । थोर मांडिलें पाप पैं ॥९८॥ आतां श्रीहरि क्षीरसागरीं । यावरी कैसा विचार करी । तें कथा-कौतुक चतुरीं । सेविजे सादर होवोनियां ॥९९॥ श्रीकृष्णकथाकमळ सुकुमार । सज्जन श्रोते त्यावरी भ्रमर । माजी पद्यरचना केसर । अतिसुवासें सेविजे ॥२००॥ कीं कृष्णकथा दुग्ध सुरस । सज्जन तुम्ही राजहंस । सेवा होवोनि साव-काश । निद्रा आळस टाकूनि ॥१॥ कीं हे कथा सुधारस सुंदर । तुम्ही संत श्रोते निर्जर[4] । हें अमृतपान करितां दुर्धर । जन्ममरण तुटे पैं ॥२॥ स्वर्गीचें अमृत देव प्राशिती । ते नाश पावती कल्पांतीं । त्यांसी आहे पुनरावृत्ती[5] । जन्मपंक्ति सुटेना ॥३॥ तैसी नव्हे ही कथा । पुनरावृत्ति नाहीं कल्पांता । ब्रह्मानंदपद[6] ये हाता । तेथींच्या अर्था पाहतां हो ॥४॥ ब्रह्मानंदकृपेच्या बळें । हें ग्रंथजहाज चाले । भक्तीचें शीड वर लाविलें । दयावातें फडकतसे ॥५॥ ब्रह्मानंद-रूप साचार । तुम्ही संत श्रोते निर्धार । वारंवार श्रीधर । चरण वंदी प्रीतीनें ॥६॥ या अध्यायाचें अनुसंधान । वसुदेवाचें जाहलें लग्न । कंसें येऊनि आपण । बाळें मारिलीं सहाही ॥७॥ इति श्रीहरिविजयग्रंथ । संमत हरिवंश भागवत । चतुर परिसोत संत । द्वितीयाध्याय गोड हा ॥८॥ श्रीकृष्णार्पणमस्तु । श्रीमज्जगदीश्वरार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ २ ॥

---

१ नेट धरून, जलदीनें. २ अगणित. ३ ब्राह्मण. ४ देव. ५ पुनर्जन्म. ६ सायुज्यता मुक्ति.



श्रीगणेशायनमः । जय जय अनंतब्रह्मांडनायका । चतुराननाचिया[1] निजजनका । चौघांशींही[2] नव्हे आवांका । तुझें स्वरूप वर्णाया ॥ १ ॥ साहीजणें[3] वेडीं होती । अठरांची[4] खुंटली गती । चौघीजणी[5] तटस्थ पाहती । स्वरूपस्थिति न वर्णवे ॥ २ ॥ पांचां[6] नुरेचि ठाव । चारी[7] सहजचि जाहली वाव । चौदांजणींची[9] ठेव । नचलें स्वरूप वर्णावया ॥ ३ ॥ शिणल्या बहुत चौसष्टी[10] । आठजणी[11] बहुत कष्टी । अकराही[12] हिंपुटी । स्वरूप तुझें वर्णितां ॥ ४ ॥ आणीक एक बारा[13] देखण्या । सोळाजणी[14] चतुर शाहाण्या । आणि चौघी[15] डोळे मोडण्या । लाजोनियां तटस्थ ॥ ५ ॥ पंचवीसां[16] जाहली वाव । तिघांचें[17] नुरेचि नांव । दोन्ही[18] म्हणणें हा भाव । हेंही तेथें विरलें ॥ ६ ॥ चहूं[19] मुखांचा वर्णितां भागला । पांचां[20] मुखांचा तटस्थ राहिला । सहा मुखांचा[21] दडाला । कपाटामाजी जाऊनि ॥ ७ ॥ सहस्र मुखांचा वर्णितां देख । तोही जाहला तळीं तल्पक[22] । थोरथोरांसी पडले अटक[23] । एक मुखें काय वर्णूं ॥ ८ ॥ जीमूतींचे[24] बिंदू किती । हेही एक वेळां होय गणती । निराळीं[25] पायीं वेघती[26] । परी तुझी स्थिति अगम्य ॥ ९ ॥ होईल पृथ्वीचें वजन । गणवेल सिंधूचें जीवन । अवनीवरी किती तृण । मोजवेल गणितां तें ॥ १० ॥ अंबर आहे किती विती । हेंही गणवेल रमापती । परी तुझे गुण निश्चिती । न वर्णवती कोणातें ॥ ११ ॥ असो आतां पूर्वानुसंधान । द्वितीयाध्याय संपतां पूर्ण । कंसें देवकीचें गर्भ वधून । साही टाकिले बंदिशाळे ॥ १२ ॥ पाप जाहलें उत्कट जाण । गांजिले गाई ब्राह्मण । यावरी क्षीरसागरीं जगज्जीवन । काय करितां जाहला ॥ १३ ॥ अनंतासी म्हणे अनंत । चला अवतार घेऊं त्वरित । करूं दुष्टांचा निःपात । संत भक्त रक्षूं पैं ॥ १४ ॥ तंव बोले धरणीधरें[27] । मी न घे आतां अवतार । पूर्वीं मी जाहलों सौमित्रें[28] । कष्ट फार भोगिलें ॥ १५ ॥ हांसोनि बोले द्विसहस्रनयन । अष्टाविंशोति[29] अयनें उपोषण । निराहार घोर अरण्य । तुम्हांसवें सेविलें जी ॥ १६ ॥ आतां आपणाचि अवतरावें । अवतारनाट्य दाखवावें । गोब्राह्मण सुखी रक्षावे । प्रतिपाळावे साधुजन ॥ १७ ॥ टाकोनि कपट कुटिलभाव । स्वामीसी हांसे भोगिराव । बोले कौतुकें रमाधव । शेषाप्रति स्वानंदें ॥ १८ ॥ तूं माझा

---

१ ब्रह्मदेवाच्या. २ चारी वेदांना. ३ सहा शास्त्रें. ४ अठरा पुराणांची. ५ चार मुक्ति. ६ पांच रसांना. ७ चार अंतःकरणें. ८ निष्फळ. ९ चौदा विद्या. १० चौसष्ट कला. ११ अष्टसिद्धि. १२ अकरा रुद्र. १३ बारा राशी. १४ सोळा कला. १५ चार वाचा. १६ पंचवीस तत्त्वांना. १७ तीन गुणांचें. १८ प्रकृति आणि पुरुष. १९ ब्रह्मदेव. २० महादेव. २१ कार्तिकस्वामी. २२ शय्या. २३ प्रतिबंध, मर्यादा. २४ मेघांचे. २५ आकाशांत. २६ चढतात. २७ शेषाला. २८ लक्ष्मण. २९ अठ्ठावीस.

प्राणसखा । समरभूमीचा[1] पाठिराखा । तुजाविण भक्तटिळका । अवतार मी न घेचि ॥१९॥ तूं माझें निजांग पूर्ण । तूं सखया माझा निजप्राण । तुजविण मज एक क्षण । न गमेचि जिवलगा ॥२०॥ तूं जाहलासी पूर्वीं लक्ष्मण । लंकेसी केलें रणकंदन । बहुत सेवा करून । मज तुवां तोषविलें ॥२१॥ आतां तूं पुढें जाय सत्वर । होई माझा ज्येष्ठ सहोदर[2] । मी तुझी आज्ञा पाळीन निर्धार । बळिभद्र होई तूं । ॥२२॥ वडील बंधु तूं होई । देवकीच्या गर्भीं जाऊनि राहीं । मी योगमायेस लवलाही । पाठवितों तुजमागें ॥२३॥ कंसें वधिलें गर्भ सकळ । तुज योगमाया काढील । मग गोकुळीं नेऊन ठेवील । रोहिणीच्या निजगर्भीं ॥२४॥ माया जाईल यशोदेच्या उदरा । मग मी येईन मथुरापुरा । देवकीचा गर्भवोवरा[3] । माझा अवताररूप होय ॥२५॥ उपजतांचि गोकुळीं येईन । मग तुझी आम्हीं खेळों दोघेजण । गोरक्षमिषें[4] संपूर्ण । दैत्य तेथील संहारूं ॥२६॥ करून साष्टांग नमन । पुढें चालिला संकर्षण[5] । देवकीच्या उदरीं येऊन । गर्भ राहिला सातवा ॥२७॥ दिवसेंदिवस गर्भ वाढे । मंदिरीं परम प्रकाश पडे । जैसा पळेंपळ सूर्य चढे । उदयाद्रीहूनि पश्चिमे[6] ॥२८॥ वसुदेवाप्रति देवकी बोले । सहा वेळां मी गर्भिणी जाहलें । परी नवल वाटतें ये वेळें । या गर्भाचें मजलागीं ॥२९॥ वाटे पृथ्वी उचलीन । कीं आकाश धीर देईन । सप्त समुद्र सांठवीन । नखाग्रीं मज वाटतसे ॥३०॥ हातीं घेऊन नांगर मुसळ । मीच मर्दीन कंसदळ । दैत्य मारावे समूळ । मनामाजी वाटतसे ॥३१॥ वसुदेव म्हणे ते क्षणीं । न कळे ईश्वराची करणी । येवढा तरी वांचोनी । विजयी हो कां सर्वदा ॥३२॥ तों लागला सातवा मास । निद्रा आली देवकीस । वसुदेवही सावकाश । निद्रार्णवीं[7] निमग्न ॥३३॥ तंव ती हरीची योगमाया । तिची ब्रह्मादिकां न कळे चर्या[8] । इच्छामात्रें महत्कार्या । ब्रह्मांड हें रचियेलें ॥३४॥ ब्रह्मा विष्णु शिव तिन्ही । गर्भीं आलीं बाळें तान्हीं । परी एकासी नेत्र उघडूनी स्वरूप पाहों नेदीच ॥३५॥ आत्मसुखाचा समुद्र । त्यांत पहुडले[9] जीव समग्र । परी चाखों नेदी अणुमात्र । गोडी तेथींची कोणातें ॥३६॥ हे चैतन्याची बुंथी[10] । हे अरूपाची रूपकर्त्री । ब्रह्मांडींचे पुतळे नानागती । एका सूत्रें नाचवी पैं ॥३७॥ इनें निर्गुण[11]

१ युद्धभूमीचा. २ बंधु. ३ गर्भाशय. ४ गाई राखण्याचे निमित्तानें. ५ शेष. ६ पूर्वेकडून. ७ निद्रारूपी समुद्रांत. ८ रीत. ९ निजले, पडून राहिले. १० आवरण, आच्छादन. ११ सत्व, रज, तम या गुणांच्या पलीकडचें.

गुणासी आणिलें । इनें अनामासी नाम ठेविलें । इनें निराकारा आकारिलें । धरविले अवतार ॥३८॥ हे पतीस न कळतां । गर्भिणी जाहली पतिव्रता । ब्रह्मांड रचिलें तत्त्वतां । इच्छामात्रें करूनियां ॥३९॥ शेजे निजवूनि भ्रतार । सृष्टी घडी मोडी समग्र । समाचार आणुमात्र । कळों नेदी पतीतें ॥४०॥ हे कौटाळीण निर्धारीं । नसतींच दैवतें उभीं करी । जीव पाडिलें अघोरीं । नाना योनीं हिंडवी ॥४१॥ धरील कोणी स्वरूपाची चाड । त्यावरी घाली नसतें लिगाड । पुढें स्वर्गसुख करी आड । तेंचि गोड दाखवी ॥४२॥ गोड तें कडवट केलें । कडवटा गोडपण दाखविलें । अहंकारमद्य जीवा पाजिलें । वेडे केले सर्वही ॥४३॥ आतां असो हे मायाराणी । इची विपरीतचि करणी । तिनें देवकीचा गर्भ काढूनी । गोकुळासी पैं नेला ॥४४॥ कैसा नेला काढूनी । ब्रह्मादिकां न कळे करणी । रोहिणी वसुदेवाची पत्नी । नंदगृहीं होती ते ॥४५॥ कंसाचिया भयें जाण । नंदगृहीं राहिली लपोन । तिच्या पोटीं नेऊन । गर्भ घातला ते क्षणीं ॥४६॥ निजले ठायीं गर्भ । पोटांत घातला स्वयंभ । परम तेजस्वी सुप्रभ । सूर्य जैसा तेजस्वी ॥४७॥ जागी जाहली रोहिणी । तों सातमासाची गर्भिणी । म्हणे कैसी जाहली करणी । चिंता मनीं वर्तत ॥४८॥ पुरुष नसतां गर्भ राहिला । परम चिंताक्रांत ते अबला । नंदयशोदेस कळला । समाचार सर्व तो ॥४९॥ जीवीं झोंबला चिंताग्नी । तों आकाशीं वदली देववाणी । चिंता करूं नको रोहिणी । वसुदेवाचा गर्भ असे ॥५०॥ पोटा येतो भोगींद्र । उतरील पृथ्वीचा भार । ऐकतां हें उत्तर । सुख जाहलें समस्तां ॥५१॥ लोकापवाद सर्व हरला । चिंतेचा डाग धुतला । तों बळिराम जन्मला । नवमास भरतांचि ॥५२॥ प्रकाशला सहस्रकिरण । तैसा बाळ देदीप्यमान । नंदें जातक वर्तवून । बळिभद्र नाम ठेविलें ॥५३॥ ऐसा उपजला अहींद्र । तों यशोदा जाहली गरोदर । हरिमायेनें अवतार । तेथें घेतला तेधवां ॥५४॥ यशोदा गर्भिणी जाहली । इकडे कथा कैसी वर्तली । देवकी पाहे घाबरली । तों गर्भ नाहीं पोटांत ॥५५॥ नेणों कैसी जाहली करणी । सांगे वसुदेवालागोनी । म्हणे गर्भ न पडेचि धरणीं । गेला जिरोनि पोटांत ॥५६॥ वसुदेव म्हणे ते वेळां । कंसधाकें गर्भ जिराला । न कळे ईश्वराची कळा । कंसास कळला

१ नामरहितास. २ लाघवी, मायावी. ३ इच्छा. ४ संकट. ५ मध्यें आणी. ६ अहंकाररूपी दारू. ७ कर्तृत्व, कृत्य. ८ स्त्री. ९ शेष. १० सूर्य.

समाचार ॥५७॥ दूत सांगती कंसातें । गर्भ जिराला जेथिंचा तेथें । कंस म्हणे आतां आठव्यातें । बहुत जपा सर्वही ॥५८॥ देवकी होतांचि गर्भिणी । जागा नेत्रीं तेल घालून । आठव्याची आठवण । विसरूं नका सर्वथा ॥५९॥ देवकी-उदरींचा आठवा । निजध्यास बैसला कंसभावा[1] । जनीं वनीं अवघा । आठवा आठवा आठवत ॥६०॥ जाग्रतीं सुषुप्तीं स्वप्नीं । आठवा दिसे ध्यानीं मनीं । आठवा दिसे भोजनीं । आठवा शयनीं सोडीना ॥६१॥ भूमि दिसे आठव्याऐसी । आठवा दिसे आकाशीं । आठव्यानें व्यापिलें त्यासी । दिवसनिशीं[2] आठवा ॥६२॥ इकडे क्षीरसागरीं श्रीहरि । क्षीराब्धिसुतेसी[3] आज्ञा करी । पद्माक्षि[4] तूं क्षितीवरी[5] । क्षितिपाळउदरीं[6] अवतरें ॥६३॥ वैदर्भदेशींचा भीमक राजा । तयाची तूं होय आत्मजा[7] । तात्काळ चालली कमळजा[8] । नमस्कारून हरीतें ॥६४॥ जगद्वंद्य स्वयें आपण । प्रवेशला मथुरापट्टण । देवकीचे गर्भी येऊन । राहतां जाहला कौतुकें ॥६५॥ गर्भवासा आला भगवंत । म्हणतां हांसतील साधुसंत । लीलावतारी जगन्नाथ । जन्ममृत्यु त्या कैंचा ॥६६॥ ज्याचें करितां स्मरण । जाय जन्ममृत्यु खंडोन[9] । तो राहिला गर्भी येऊन । कल्पांतींही घडेना ॥६७॥ उगाच लौकिकभाव । दाविली मृत्युलोकींची ठेव । तो ब्रह्मानंद स्वयमेव[10] । जन्म मृत्यु त्या कैंचा ॥६८॥ क्षीरसागरींहून हरि आला । तरी तो ठाव काय ओस[11] पडिला । तो तैसाच संचला । लक्ष्मीशेषांसमवेत ॥६९॥ अनंत रूपें अनंत नामें । अनंत अवतार अनंत कर्मे । अनंत लीला घनश्यामें । भक्तांलागीं दाविल्या ॥७०॥ अनंत ब्रह्मांडें अनंत शक्ती । अनंत युगींच्या अनंत कीर्ती । अनंत रूपें अनंत मूर्ती । अतर्क्य गति वेदशास्त्रां ॥७१॥ असो लौकिक विचार देख । गर्भी आला लक्ष्मीनायक[12] । कंसासी लाविला धाक । देखिला नसतां सर्वदा ॥७२॥ देवकी जाहली गर्भिणी । तेज न माये गगनीं[13] । खेद कांहीं न वाटे मनीं । सुखेंकरूनि डुल्लत ॥७३॥ पोटा आला विदेही[14] हरी । देवकी नाहीं देहावरी । जनीं वनीं दिगंतरीं । अवघा मुरारि[15] दिसतसे ॥७४॥ वसुदेव म्हणे देवकीप्रती । तुज चिंता कां न वाटे चित्तीं । आठव्याची कैसी गती । होईल ते न कळे पां ॥७५॥ कंस जपतो बहुत । आठव्याचा करावया घात[16] । यावरी देवकी

१ कंसाच्या मनाला. २ रात्रंदिवस. ३ लक्ष्मीला. ४ कमलनयने. ५ पृथ्वीवर. ६ राजाचे पोटीं. ७ कन्या. ८ लक्ष्मी. ९ नाश पावतात. १० स्वतः, आपण. ११ रिता. १२ विष्णु. १३ आकाशांत. १४ देहरहित असा, निराकार. १५ कृष्ण. १६ वध.

बोलत । प्रतिउत्तर काय तेव्हां ॥७६॥ भुजा[1] पिटोन बोले वचन । कंसास मारीन आपटोन । मुष्टिकचाणूरांचा प्राण । क्षणमात्रें घेईन मी ॥७७॥ हांक फोडोन गर्जे थोर । उतरीन पृथ्वीचा भार । करून दैत्यांचा संहार । बंदिशाळा फोडीन मी ॥७८॥ आणी वेगें धनुष्यबाण । युद्ध करीन मी दारुण[2] । जरासंध रथी बांधोन । सत्रा वेळां आणीन मी ॥७९॥ भस्म[3] करिन कालयवन । रचीन द्वारका पट्टण । सकळ नृपां शिक्षा लावून । पट्टराणी आणीन मी ॥८०॥ हांक फोडिली क्रोधें थोर । जिवें मारीन भौमासुर । निर्वटीन कौरवभार । निजभक्तकैवारें ॥८१॥ मी भक्ताचा सारथि होईन । दुष्ट सर्व संहारीन । मी ब्रह्मानंद परिपूर्ण । अवतरलों पृथ्वीवर ॥८२॥ वसुदेवासी चिंता वाटे । ही गर्जती येवढ्या नेटें[5] । जरी बाहेर मात[6] प्रकटे । तरी अनर्थ होईल पां ॥८३॥ वसुदेव बोले वचन । देवकी धरीं आतां मौन । येरी म्हणे कैंची देवकी पूर्ण । ब्रह्म सनातन मी असें ॥८४॥ स्त्री पुरुष नपुंसक । त्यांहूनि वेगळा मी निष्कलंक[7] । सकळमायाचक्रचाळक । कर्ता हर्ता मीच पैं ॥८५॥ मी सर्वद्रष्टा[8] अतींद्रिय[9] । मी अज[10] अव्यय[11] निरामय[12] । अजित[13] अपार[14] निष्क्रिय[15] । आनंदमय वर्तें मी ॥८६॥ मी प्रळयकाळाचा शास्ता । मी आदिमायेचा नियंता । मी चहूं वाचांपरता । मायानिर्मिता मीच पैं ॥८७॥ मीच सगुण मीच निर्गुण । मीच थोर मीच लहान । देव दैत्य निर्मून । पाळिता हर्ता मीच पैं ॥८८॥ ऐसें देवकी बोलोन । मागुती धरिलें मौन । तों आकाशीं देव संपूर्ण । गजर करिती दुंदुभींचा ॥८९॥ अवतरेल आतां भगवंत । करिल दुष्टांचा निःपात । देव मिळोन समस्त । गुप्त मथुरेंत उतरले ॥९०॥ ब्रह्मादिक आणि चंद्र । बंदिशाळें पातले समग्र । देवकीस प्रदक्षिणा करिती सुरवर । एक नमस्कार घालिती ॥९१॥ उभे ठाकूनि बद्धांजली । गर्भस्तुति आरंभिली । जय सच्चिदानंद वनमाळी । देवकीजठरगर्भा ॥९२॥ जय हरे नारायणा गोविंदा । इंदिरावरा आनंदकंदा । सर्वेशा मुकुंदा परमानंदा । परमपुरुषा परेशा[16] ॥९३॥ पद्मजजनका पुरातना[17] । पंकजनेत्रा परमपावना । पद्मवल्लभा पशुपतिजीवना[18] । पयोब्धिवासा[19] परेशा

---

१ दंड. २ घनघोर. ३ जाळून टाकीन. ४ नाहींसा करीन. ५ मोठ्यानें. ६ खबर. ७ कलंकावेगळा, उपाधिरहित. ८ सर्व पाहणारा, सर्वसाक्षी. ९ इंद्रियांनीं समजण्यास अशक्य. १० जन्मरहित. ११ शाश्वत, नष्ट न होणारा. १२ आनंदी, निर्भय. १३ पराभव न पावणारा, ईश्वर. १४ अंत नाहीं असा. १५ क्रियारहित. १६ श्रेष्ठ. १७ आदिपुरुषा. १८ महादेवाच्या प्राणविसांव्या. १९ क्षीरसागरांत वास करणाऱ्या.

